# महाराष्ट्र शासन

अविवि-२०१३/प्रक्र.१७८/का.०७,
अल्पसंख्याक विकास विभाग,
मादाम कामा रोड, हुतात्मा चौक
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
दि. २७/०३/२०१५

**विषय :- केंद्र पुरस्कृत अल्पसंख्यांक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजनेंतर्गत (MsDP) जालना शहर, जिल्हा जालना येथे अल्पसंख्यांक समाजातील मुलांसाठी १०० प्रवेशक्षमतेचे वसतीगृह बांधकामास (विद्युतीकरणासह) प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**संदर्भ :-** १.अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.३/१३(२)/२०१३-PP, दि.२९/१०/२०१४
२.जिल्हाधिकारी, जालना यांचे पत्र क्र. २०१५/ अल्प.स./ साप्र/कावि-दि. १७/०३/२०१५.

**ज्ञापन:-**

१२ व्या पंचवार्षिक योजनेत केंद्र शासनाच्या अल्पसंख्यांक कार्य मंत्रालयाने बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रमाअंतर्गत (MsDP) गठीत शक्तीप्रदान समितीने दि. ०१/०९/२०१४ रोजीच्या ८९ व्या बैठकीत जालना शहर, जि. जालना येथे मुलांच्या १०० प्रवेशक्षमतेच्या ०१ वसतीगृह बांधकामास (विद्युतीकरणासह) मान्यता दिली असून, संदर्भाधिन क्र. (१) येथील पत्रान्वये पहिल्या टप्प्यातील निधी वितरित केला आहे. केंद्र शासनाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन जिल्हाधिकारी, जालना यांनी संदर्भाधीन क्र. (२) येथील पत्रान्वये जालना शहर, जि. जालना येथील मुलांच्या १०० प्रवेशक्षमतेच्या वसतीगृह बांधकामास (विद्युतीकरणासह) प्रशासकीय मान्यता देण्याच्या दृष्टीने आवश्यक प्रस्ताव ढोबळ अंदाजपत्रकासोबत प्रशासकीय मान्यतेसाठी शासनास सादर केला आहे.

जिल्हाधिकारी, जालना यांनी सादर केलेला जालना शहर येथील मुलांच्या १०० प्रवेशक्षमतेच्या वसतीगृह बांधकामाचा (विद्युतीकरणासह) ढोबळ अंदाजपत्रकाचा (बांधकामसूची दर सन २०१४-१५ नुसार) गोषवारा पुढीलप्रमाणे आहे :-

| अ.क्र. | तपशील | प्रस्तावित रक्कम रुपये | प्रशासकीय मान्यता दयावयाची प्रस्तावित रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | मुख्य इमारत बांधकाम | ३,००,७३,६४१/- | ३,००,७३,६४१/- |
| | एकूण | ३,००,७३,६४१/- | ३,००,७३,६४१/- |
| २ | ३% प्रशासकीय खर्च | ९,०२,२०९/- | ९,०२,२०९/- |
| | **एकूण** | **३,०९,७५,८५०/-** | **३,०९,७५,८५०/-** |
| | **से. रु.** | **३,१०,००,०००/-** | **३,१०,००,०००/-** |

२. जिल्हाधिकारी, जालना यांनी सादर केलेल्या जालना शहर, जि. जालना येथील मुलांच्या १०० प्रवेशक्षमतेच्या वसतीगृहाच्या बांधकामासाठी (विद्युतीकरणासह) ढोबळ अंदाजपत्रकानुसार एकूण

रु.३,१०,००,०००/- (रुपये तीन कोटी, दहा लाख मात्र) इतका खर्च अपेक्षित आहे. त्यानुसार मुलांच्या १०० प्रवेशक्षमतेच्या वसतीगृहाच्या बांधकामासाठीच्या एकूण रु. ३,१०,००,०००/- (रुपये तीन कोटी, दहा लाख मात्र) इतक्या खर्चाच्या ढोबळ अंदाजपत्रकास याव्दारे पुढील अटींच्या अधिनतेने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.:-

१. जिल्हाधिकारी, जालना यांनी जालना शहर येथील मुलांच्या १०० प्रवेशक्षमतेच्या वसतीगृहाचे बांधकाम हे मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, महाराष्ट्र राज्य यांनी तयार केलेल्या (क्रमांक–T HLSL-6119) बांधकाम आराखडयानुसार करणे आवश्यक राहील.

२. जिल्हाधिकारी, जालना यांनी प्रस्तावित वसतीगृह बांधकामाच्या (विद्युतीकरणासह) सविस्तर अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिका-याची तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घेणे त्याचप्रमाणे, सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सक्षम प्राधिकाऱ्याने मान्यता दिलेल्या सविस्तर अंदाजपत्रकानुसार (तांत्रिक मान्यतेसह) वसतीगृह बांधकामाची पुढील कार्यवाही करणे आवश्यक राहील,

३. केद्रशासनाने मान्यता दिल्यानुसार मुलांचे १०० प्रवेशक्षमतेच्या वसतीगृह बांधकामासाठी (विद्युतीकरणासह) केंद्र+राज्यहिस्साचे प्रमाण ५०:५० असे आहे. त्यानुसार जिल्हाधिकारी, जालना यांनी वसतीगृहाच्या बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे विहित नमुन्यात शासनास सादर करावीत..

४. वसतीगृहामध्ये अपंगाना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा (अंपग विद्यार्थ्यांच्याकरिता तळ मजल्यावर एक स्वतंत्र कक्ष ) उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.

५. जिल्हाधिकारी, जालना यांनी वसतीगृह बांधकामासाठी निधी उपलब्ध झाल्याशिवाय प्रत्यक्ष बांधकामास सुरुवात करु नये.

६. जिल्हाधिकारी, जालना यांनी मुलांच्या १०० प्रवेशक्षमतेच्या वसतीगृह बांधकामाची सुरुवात सन २०१५-१६ या आर्थिक वर्षापासून करावी, केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार प्रस्तावित वसतीगृह बांधकामाचे वर्षनिहाय खर्चाचे नियोजन पुढीलप्रमाणे राहील:-

(रु. कोटीत)

| आर्थिक वर्ष | अपेक्षित खर्च | सुरु असलेल्या इतर कामासाठी आवश्यक तरतूद | एकूण मंजूर तरतूद (प्रस्तावित) |
|---|---|---|---|
| २०१५-१६ | १.०० | ०० | १.५५ |
| २०१६-१७ | २.१० | ०० | १.५५ |
| **एकूण** | **३.१०** | **००** | **३.१०** |

७. प्रस्तावित वसतीगृहाच्या जमिनीवर औद्योगिक प्रशिक्षण संस्था, जालना या संस्थेची मालकी राहील तसेच जमिनीबाबतचे हक्क व अधिकार औद्योगिक प्रशिक्षण संस्था, जालना यांच्याकडे रहातील.

३. यावर होणारा खर्च “मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (००)(१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना (केंद्र हिस्सा) (२२३५ ए ५४३) ३१ - सहाय्यक अनुदान”

तसेच “मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१)(१४) अल्पसंख्याक बहुक्षेत्रीय विकास कार्यक्रम (राज्य हिस्सा) (२२३५ ए २३१) ३१ - सहाय्यक अनुदान” या उद्दिष्टाखाली उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

४. प्रस्तुत शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग पाच अ.क्र.१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. प्रस्तुत शासन ज्ञापन, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतसथळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१३१४१०१६१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANGURDE SANJAY SURYAKANT

Digitally signed by GANGURDE SANJAY SURYAKANT
DN: CN = GANGURDE SANJAY SURYAKANT, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MINORITIES DEVELOPMENT,CID - 919995
Date: 2015.03.30 13:24:06 +05'30'

**( सं. सु. गांगुर्डे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
२. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर
३. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (बांधकामे), मंत्रालय, मुंबई
४. जिल्हाधिकारी, जालना
५. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद विभाग,
६. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, जालना
७. कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम मंडळ, जालना
८. मुख्याधिकारी, जालना नगरपरिषद, जालना
९. प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, जालना.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, जालना
११. वित्त विभाग (अर्थसंकल्प -४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई
१२. नियोजन विभाग (कार्या.१४७५)
१३. निवड नस्ती, (का.७)